**मानव विकास कार्यक्रम अंतर्गत ग्रामीण महिलांना आर्थिक सहाय्य करण्यासाठी "तेजश्री फायनान्शियल्स सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)" हा नवीन उपक्रम "महिला आर्थिक विकास महामंडळ (MAVIM), मुंबई" मार्फत राबविण्यास मंजुरी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
# नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांक-माविका-२०१८/प्र.क्र.६२/का.१४१८,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई०३२ ४००-

दिनांक : ०१ फेब्रुवारी, २०१९.

<u>वाचा:</u>

१. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.:- माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८, दि.१९.०७.२०११

२. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. (१) MAVIM / PMD /२०१८ / १८, दि.२३.०४.२०१८, (२) क्र.माविम / पीएमडी / २०१८/८०, दि.२९.०६.२०१८ व (३) क्र.माविम/पीएमडी/२०१८/१९४,दि. २२.११.२०१८.

<u>**प्रस्तावना:**</u>

नियोजन विभागाचे उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णय क्र.१ अन्वये सन २०११-१२ पासुन मानव विकास कार्यक्रम राज्यातील २३ जिल्ह्यातील १२५ तालुक्यांत राबविण्यात येत आहे. यामध्ये आरोग्य, शिक्षण व उत्पन्न वाढ या ३ क्षेत्रांशी संबंधित विविध लोकहिताच्या योजना राबविण्यात येत आहेत. संदर्भाधिन पत्र क्र.२ नुसार "महिला आर्थिक विकास महामंडळ, (MAVIM) मुंबई" यांनी अतिगरीब व कर्जपिडीत महिलांना तसेच महिला आधारीत कुटुंबांना आर्थिक सहाय्य उपलब्ध करुन देण्यासाठीचा "तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)" हा नवीन उपक्रम मानव विकास कार्यक्रम अंतर्गत सुरु करण्याचा प्रस्ताव नियोजन विभागास सादर केलेला आहे. "महिला आर्थिक विकास महामंडळ, (MAVIM) मुंबई" कडून प्रस्तावित करण्यात आलेल्या या नवीन उपक्रमाद्वारे पुढील ३ वर्षात एकुण १,१२,९०० महिलांना आर्थिक सहाय्य करण्याचे लक्ष्य असुन हा नवीन उपक्रम "Livelihood Programme for Rural Women" म्हणून सन २०१८-१९ ते २०२०-२१ या ३ वर्षाच्या कालावधीत मानव विकास कार्यक्रमांतर्गत राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मानव विकास कार्यक्रमांतर्गत समाजातील अतिगरीब, कर्जपिडीत व महिलांना तसेच महिला आधारीत कुटुंबांना आर्थिक सहाय्य उपलब्ध करुन देण्यासाठी “तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)” हा नवीन उपक्रम “महिला आर्थिक विकास महामंडळ, (MAVIM) मुंबई” मार्फत राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. या नवीन उपक्रमाद्वारे ग्रामीण महिलांच्या गरजा समजून घेऊन त्यांना विकासाच्या प्रक्रियेमध्ये आणणे व त्यांना अतिगरीब व कर्जपिडीत परिस्थितीतून बाहेर पडण्यास मदत होणार आहे. त्यामुळे ग्रामीण महिलांच्या उत्पन्नात वाढ होऊन “मानव विकास निर्देशांक” वाढण्यास मदत होणार आहे. “तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)” या नवीन उपक्रमांतर्गत विविध उपाययोजनांचे स्वरुप व अपेक्षित खर्च याचा तपशील सोबतच्या परिशिष्ट “अ” व “ब” येथे दर्शविण्यात आला आहे.

२. नियोजन विभागाचे वतीने “आयुक्त मानव विकास, औरंगाबाद” व महिला व बाल विकास विभागाचे वतीने “उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, “महिला आर्थिक विकास महामंडळ, (MAVIM) मुंबई” यांचेसोबत “तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)” च्या अंमलबजावणी व सनियंत्रण संदर्भात “सामंजस्य करार (MoU)” करण्यात येईल.

३. नियोजन विभागाकडुन “आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद यांचेमार्फत “तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)**”** या उपक्रमाकरिता उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, “महिला आर्थिक विकास महामंडळ, (MAVIM) मुंबई” यांना परिशिष्ट ‘ब’ मध्ये दर्शविण्यात आल्याप्रमाणे सन २०१८-१९ ते २०२०-२१ या ३ वित्तीय वर्षामध्ये पुढीलप्रमाणे अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल.

| **आर्थिक वर्ष** | **वितरीत करावयाचा निधी (रुपये कोटीत)** |
|---|---|
| २०१८-१९ | ४१.८३ |
| २०१९-२० | २३.९० |
| २०२०-२१ | ०२.८० |
| **एकुण** | **६८.५३** |

४. नियोजन विभागाकडून वर नमुद केल्यानुसार “तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)**”** या नवीन उपक्रमाकरिता उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, “महिला आर्थिक विकास महामंडळ, (MAVIM) मुंबई” यांना सन २०१८-१९ साठी रक्कम रु.४१,८३,००,०००/- (रुपये एक्केचाळीस कोटी त्र्याएंशी लक्ष फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. यावर होणारा खर्च हा **“**मागणी क्रमांक ओ-१, २०५३ जिल्हा प्रशासन, ०९३ जिल्हा आस्थापना, पंचवार्षिक योजनाअंर्तगत योजना, ०४ आयुक्त, औरंगाबाद, (०४) (०१) मानव विकास

निर्देशांक वृद्धी करणे (२०५३ १२३१) दत्तमत, ३१- सहायक अनुदान वेतनेतर" या लेखाशीर्षाखाली प्रति वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. मानव विकास कार्यक्रमांतर्गत"तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)" या नवीन उपक्रमाचा आढावा शासन स्तरावर मा. मंत्री (वित्त आणि नियोजन, वने) यांच्याकडून घेण्यात येईल.

६. मानव विकास कार्यक्रमांतर्गत ग्रामिण महिलांना आर्थिक सहाय्य करण्यासाठी "तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)" हा नवीन उपक्रम "महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत (MAVIM), मुंबई" मार्फत राबविण्यास मंजुरी देण्याबाबत नियोजन विभागाचा हा शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.४४३/२०१८/व्यय ८, दि.२६.१२.२०१८ अन्वये प्राप्त केलेल्या सहमतीने तसेच नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.:- माविमि-२०१०/ प्र.क्र.८१/ का.१४१८, दि.१९.०७.२०११ मधील परिच्छेद ४(vii) मधील तरतुदीनुसार शासनाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

७. नियोजन विभागाचा हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२०२११५२२७८०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2019.02.02 12:58:33 +05'30'

**(वि.फ.वसावे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१) मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव.

२) मा.राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर

५) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

६) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर

७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

८) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०) आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद.

११) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष मानव विकास समिती, पालघर, ठाणे, रायगड, सिंधुदुर्ग, नाशिक, धुळे, जळगाव, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, नागपुर, भंडारा, गोंदिया, चंद्रपुर व गडचिरोली.

१२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१३) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, (नवी मुंबई , नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपुर)

१४) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई

१५) जिल्हा मानव विकास अधिकारी, जिल्हा मानव विकास समिती, पालघर, ठाणे, रायगड, सिंधुदुर्ग, नाशिक, धुळे, जळगाव, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, नागपुर, भंडारा, गोंदिया, चंद्रपुर व गडचिरोली)

१६) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.

१७) उप सचिव (कार्यासन १०), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८) उपसचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

१९) निवड नस्ती, कार्यासन १४१८ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

# परिशिष्ट-‘अ’

## “तेजश्री फायनान्शियल सर्व्हीसेस (Tejashree Financial Services)”

**(१) अतिगरीब महिलांसाठी कुटुंबांसाठी कर्जसहाय्य (Ultra Poor Women’s Loan Scheme)**

| | |
|---|---|
| लक्ष्य घटक | स्वयंसहाय्य बचत गटात सहभागी असलेल्या अतिगरीब महिला यांची निवड व शिफारस करण्याची जबाबदारी माविम प्रमोटेड CMRC ची राहिल. |
| संस्थात्मक लक्ष्य | ०३ वर्षात १०,००० अतिगरीब महिला |
| पात्रता निकष | • सदर सदस्य किमान ०६ महिन्यांपासून स्वयंसहाय्य बचत गट सदस्य असाव्यात.<br>• स्वयंसहाय्य बचत गटात ठरल्याप्रमाणे दरमहा मासिक बचत जमा केलेली असावी. |
| कर्ज रक्कम | प्रती व्यक्ती रू.१०,००० पर्यंत |
| कर्ज उद्देश | स्वयंरोजगारी लघुउद्योग |
| कर्जपरतफेड कलावधी | सर्वसाधारणपणे ०२ वर्षाचा परतफेड कालावधी राहील. (Moratorium कालावधी सोडून). Moratorium कालावधी हा साधारणतः ३ ते ०६ महिन्याचा राहिल. |
| कर्ज व्याजदर | प्रती वर्ष ८% (reducing balance नुसार) यामध्ये २% सर्व्हीस चार्जेस CMRC दैनंदिन संनियंत्रण व हॅन्डहोल्डींग सहाय्य देऊ शकेल. |
| आर्थिक स्त्रोत | नियोजन विभाग, महाराष्ट्र शासन |
| अतिरिक्त सेवा सुविधा | १) संबंधित व्यक्ती जे व्यवसाय सुरू करतील त्यातील लाईव्हीलीहुड ॲसेट -जनावरे/ यंत्रे इ.चा विमा काढला जाईल.<br>२) महाराष्ट्र शासनाच्या ग्राम विकास विभागामार्फत सुरू असलेले व्याजदर परतावा योजना, सुमतीबाई सुकळकर योजना याचा लाभ संबंधित व्यक्तींना मिळू शकेल . |

(२) **कर्ज विळख्यात अडकलेल्या महिलांना आर्थिक सहाय्य योजना (Financial Assistance to women to Repay debts)**

| | |
|---|---|
| लक्ष्य घटक | कर्ज विळख्यामध्ये अडकलेले / कर्ज पिडीत असे स्वयंसहाय्य बचत गटातील सदस्य यांची निवड करणे व शिफारस करणे ही माविम प्रमोटेड CMRC ची जबाबदारी राहिल. |
| संस्थात्मक लक्ष्य | पुढील ०३ वर्षात १०,००० कुटुंबे मानव विकास मिशन अंतर्गत समाविष्ट असलेले तालुके. |
| बचत गटासाठी पात्र निकष | बैठकीची नियमितता - ९५ %<br>बैठकीतील उपस्थिती - ९०%<br>सदस्यांची बचत नियमितता- ९०%<br>बँक कर्ज परतफेड - ९८%<br>CMRC ला गेली ०३ वर्षे नियमितपणे सर्व्हीस चार्जेस मिळालेले असणे. |
| सदस्यांसाठी पात्र निकष | गटाचे किमान ०२ वर्षापासूनचे सदस्यत्व असावे.<br>गट बँकांची उपस्थिती ९०%<br>बचत गटामध्ये नियमित बचत ९०%<br>बँक कर्ज /अंतर्गत कर्ज परतफेड ८५% |

| | |
|---|---|
| कर्ज रक्कम | रू.२०,०००/- पर्यंत |
| कर्ज घेण्याचे कारण | बँकेचे पूर्वीचे थकित कर्ज परत करणेबाबत. |
| कर्जपरतफेड कलावधी | ०३ वर्षे u Moratorium period ३ months. |
| कर्ज व्याजदर | १०% प्रती वर्ष (reducing तत्वावर). यापैकी २% सर्व्हीस चार्जेस CMRCला दिले जातील. |
| आर्थिक स्त्रोत | नियोजन विभाग, महाराष्ट्र शासन |

**(३) सोशल एंटरप्राईजेसला खेळते भांडवल-(Working Capital for Social Enterprises)**

| | |
|---|---|
| लक्ष्य | माविम प्रमोटेड CMRC व्दारे सुरू सोशल एंटरप्राईजेस उपक्रम. |
| आर्थिक लक्ष्य | पुढील ०३ वर्षात ३०० सोशल एंटरप्राईजेस. |
| CMRC निवडण्यासाठी पात्रता निकष | CMRC मधील ९०% गटांनी सर्व्हीस चार्जेस भरलेले असणे.<br>CMRC कार्यकारीणी/RGB सदस्यांनी बैठकीमधील ८५% नियमित उपस्थिती.<br>किमान ०३ वर्षापासून कार्यरत असावे. |
| कर्ज रक्कम | रू.२.०० लाखापर्यंत |
| कर्ज कारण | स्टॅार्ट-अप कर्ज |
| कर्जपरतफेड कलावधी | २ वर्षापर्यत (१-२ महिने Moratorium period) |
| कर्ज व्याजदर | १०% reducing तत्वावर |
| आर्थिक स्त्रोत | नियोजन विभाग, महाराष्ट्र शासन / मुद्रा |

## परिशिष्ट-'ब'

| तपशील | २०१८-१९ | २०१९-२० | २०२०-२१ | एकूण (रु.कोटी) |
|---|---|---|---|---|
| **फिरता निधी** | ३६.९६ | २०.५१ | निरंक | **५७.४७** |
| **अतिगरीब महिलेची कौशल्यवृद्धी व क्षमतावृद्धी** (रु.१००० प्रती अतिगरीब महिला) | ३.८७ | ३.३९ | २.८ | **१०.०६** |
| **आर्थिक सेवा शुल्क** | १.०० | --- | --- | **१.००** |
| **एकूण आवश्यक निधी** | **४१.८३** | **२३.९०** | **२.८** | **६८.५३** |